गट "ड" च्या कर्मचा-यांचे भविष्य निर्वाह निधीचे लेखे ठेवण्याबाबत व भविष्य निर्वाह निधी परतावा/ ना - परतावा अग्रिम देयके सादर करताना घ्यावयाच्या दक्षतेबाबत व प्रमाणपत्र सादर करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन.

सामान्य प्रशासन विभाग

शासन परिपत्रक क्रमांक-भ.नि.नि. २००४/प्र.क्र.३६/२००३/१३-अ,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक- ११ ऑगस्ट,२००४.

**वाचा:-** १) शासन परिपत्रक ,सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-पीएफआर-१०६४/जे, दि.१२ मार्च, १९६४.

२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक- पीएफआर-१०७५/४२८/१३, दि. १४ सप्टेंबर १९७६.

३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-भनिनि १०९५/१०९८/१३-अ , दि. २४ फेब्रुवारी १९९८.

**-: परिपत्रक :-**

संदर्भाधीन क्र. १ च्या परिपत्रकान्वये गट "ड" च्या शासकीय कर्मचा-यांचे भविष्य निर्वाह निधी लेखे ठेवण्याबाबत व त्याबाबतची विहित विवरणपत्रे नियत कालावधीत विभाग प्रमुख / महालेखापाल कार्यालयाकडे पाठविण्याबाबतची कार्यपध्दती स्पष्ट करण्यात आली आहे. संदर्भाधीन क्र. २ च्या परिपत्रकान्वये गट "ड" च्या कर्मचा-यांचे भ.नि.नि. पासबुक देण्याबाबतची कार्यपध्दती स्पष्ट करण्यात आली आहे. तसेच वरील परिपत्रकानुसार कार्यपध्दती अनुसरुन विहित विवरणपत्रे नियमितपणे महालेखापाल कार्यालयांकडे पाठवून त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करण्याच्या सूचना देण्यात आल्या आहेत.

२. तथापि काही विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख उपरोक्त परिपत्रकांत दिलेल्या सूचनानुसार कार्यवाही करीत नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. त्यामुळे शासनाचे नुकसान होण्याची शक्यता असून वर्गणीदाराच्या भ.नि.नि. खाती पुरेशी शिल्लक नसतानाही सक्षम प्राधिका-याकडून विहित मर्यादेपेक्षा जास्त रक्कम मंजूर झाल्याचे लेखा व कोषागार कार्यालयाने शासनाच्या निदर्शनास आणले आहे. त्यामुळे याबाबत शंका निर्माण झाली आहे. त्याचप्रमाणे काही विभाग गट -क व त्यावरील शासकीय कर्मचा-यांच्या वेतन देयकांबरोबर भ.नि.नि. अनुसुची मध्ये वर्गणीदारांचा अचूक भ.नि.नि. खाते क्रमांक नमूद करतात. परंतू वर्गणीदारांच्या भ.नि.नि. परतावा / ना-परतावा देयकांवर वर्गणीदारांचा चुकीचा भ.नि.नि. खाते क्रमांक लिहिला जातो. त्यामुळे सदर रकमेची नोंद संबंधीत वर्गणीदारांच्या खात्यात करता येत नाही व अशी रक्कम निलंबित लेख्यात ठेवावी लागते. त्याबाबत पत्रव्यवहार करुनही संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांचेकडून योग्य प्रतिसाद मिळत नसल्याबाबत महालेखापाल कार्यालयाने शासनाच्या निदर्शनास आणले आहे.

३. उपरोक्त बाबी गंभीर स्वरुपाच्या अनियमितता असून शासनाकडून याबाबत गंभीरपणे दखल घेण्यात येत आहे. व अशा अनियमिततेची पुनरावृत्ती होऊ नये म्हणून सर्व आहरण व संवितरण अधिकारी, कार्यालय प्रमुख, विभाग प्रमुख यांना अशा सूचना देण्यात येत आहेत की, दि. १२ मार्च, १९६४ व दि. १४ सप्टेंबर १९७६ च्या परिपत्रकातील सूचनांनुसार कार्यपध्दती अनुसरुन गट "ड" च्या कर्मचा-यांचे भ.नि.नि. चे लेखे अचूकपणे विहित नमून्यात ठेवून त्याबाबतची नियतकालीक विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाकडे वेळेवर पाठवावीत. तसेच यापुढे सर्व भ.नि.नि. वर्गणीदारांच्या परतावा/ ना-परतावा देयकांसोबत या परिपत्रकासोबत जोडलेल्या परिशिष्टामध्ये विहित केलेल्या नमून्यात प्रमाणपत्र जोडल्याशिवाय भ.नि.नि. परतावा / ना- परतावा देयक अधिदान व लेखा कार्यालय / लेखा व कोषागार कार्यालय यांचेकडे सादर करण्यात येऊ नये. सदर प्रमाणपत्र व त्यामध्ये नमूद करण्यात आलेला लेखाक्रमांक व इतर तपशील देयकामध्ये अचूकपणे नमूद केला असल्याची खात्री केल्याशिवाय देयक पारित करण्यात येऊ नये.

रोटा प्रिंट/एच–582(5000–8–04)1

क्र.मा.प.

४. सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, त्यांनी त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालय प्रमुख व विभाग प्रमुखांना वरीलप्रमाणे कार्यवाही करण्याबाबत लेखी सूचना द्याव्यात. तसेच संबंधितांकडून तशी कार्यवाही नियमितपणे व वेळेवर होत असल्याबाबत नियतकालिक आढावा घेण्यात यावा. व वरीलप्रमाणे कार्यवाही होत नसल्याचे आढळून आल्यास किंवा याबाबत तक्रार प्राप्त झाल्यास संबंधित अधिकारी / कर्मचारी यांच्यावर जबाबदारी निश्चित करुन त्यांचेविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात यावी. यासंबंधी केलेल्या कार्यवाहीचा अहवाल दरवर्षी या विभागाकडे सादर करण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(चारुशीला सोहोनी)
प्र.स. (सेवा)

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
उपमुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
महालेखापाल-१ ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई (१० जादा प्रतीसह ),
महालेखापाल-२ ( लेखा व अनुज्ञयता), महाराष्ट्र, नागपूर (१० जादा प्रतीसह ),
महालेखापाल-१ ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई (१० जादा प्रतीसह ),
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र नागपूर( १० जादा प्रतीसह ),
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, राज्य निवडणुक आयोग, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ न्यायशाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
वरीष्ठ उप महालेखापाल, भविष्य निर्वाह निधी कक्ष, ब्रिजवासी बिल्डींग, सोनवाला रोड, गोरेगाव, (पूर्व ) मुंबई-४०० ०६३. (५० जादा प्रतींसह )
मुख्य लेखा परीक्षक, निवासी लेखे, कोकण भवन, नवी मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
ग्रामविकास विभाग/ नगर विकास विभाग/वित्त विभाग (कोषा- प्र-५),मंत्रालय, मुंबई.
मंत्रालयाचे इतर सर्व विभाग,
मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली असलेले सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
मंत्रालय मध्यवर्ती ग्रंथालय, मंत्रालय, मुंबई ( २ प्रती ),
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.

* पत्राने.

**शासन परिपत्रक क्र. भ.नि.नि. २००४/प्र. क्र. ३६/२००३/१३-अ, दि. ११ ऑगस्ट,२००४ चे सहपत्र**

## परिशिष्ट

भविष्य निर्वाह निधी परतावा / ना परतावा देयकासोबत जोडावयाचे प्रमाणपत्र.

**१) वर्ग "ड" च्या पदांवरील वर्गणीदारांकरीता :-**

कार्यालयाचे नांव व पत्ता

**प्रमाणपत्र**

प्रमाणित करण्यात येते की, श्री. / श्रीमती ------------------------------------------- (पदनाम), यांचा भविष्य निर्वाह निधी खाते क्रमांक ---------------------------------- असुन त्यांच्या सदर खाती प्रस्तुत देयक सादर करण्या अगोदर रु--------/- ( रुपये -------------------) इतकी रक्कम शिल्लक आहे. प्रस्तुत देयकाची रु -------------- /-( रुपये---------------------) इतकी रक्कम देयक पारित होताच व सदर रकमेचे त्यांना प्रदान करण्यापूर्वी त्यांच्या भविष्य निर्वाह निधी लेख्यात नोंदवून भविष्य निर्वाह निधी लेखा अद्यावत करण्यात येईल.

दिनांक:-

स्थळ:- आहरण व संवितरण अधिकारी

**२ वर्ग "क" व त्यावरील पदांवरील वर्गणीदारांकरीता :-**

कार्यालयाचे नांव व पत्ता

**प्रमाणपत्र**

प्रमाणित करण्यात येते की, श्री./ श्रीमती--------------------------------------- (पदनाम), यांचा भविष्य निर्वाह निधी खाते क्र. ------------असा आहे. त्यांच्या उपरोक्त खाती प्रस्तुत देयक सादर करण्या अगोदर रु. ---------------------(रुपये --------------------------) इतकी रक्कम शिल्लक आहे.

दिनांक :-

स्थळ:- आहरण व संवितरण अधिकारी

----------

एच–582(5000–8–04)2.